भुकंपग्रस्तांच्या पुनर्वसनाकरिता संपादित जमिनीचा मा.दिवाणी न्यायालयाने दिलेल्या निर्णयानुसार भुसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम-१८ अन्वये वाढीव मोबदला अदा करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत....

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

शासन निर्णय क्रमांकः पुनर्व-२०१९/२०७/प्र.क्र.४८/र-८
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १७ जुलै, २०२०

वाचा -

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.अकवा/न्यायप्रकरण/१०९९/प्र.क्र.१५२/अ-४, दि.२४.१२.२००३
२) महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक क्र.बीयुडी-२०१८/प्र.क्र.६७/ब-१, दि.९.३.२०१८
३) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे आपले पत्र क्र.२०१९/पुनर्वसन/कक्ष-१/कावि-१३५, दि.४.१२.२०१९

प्रस्तावना:-

उस्मानाबाद जिल्ह्यातील भुकंपग्रस्तांच्या पुनर्वसनासाठी जमीन संपादित करण्यात आली व भूसंपादन अधिकाऱ्याकडून जमिनीचा अंतिम निवाडा पारित करण्यात आला. भूधारकास जमिनीचा मोबदला मान्य नसल्याने, भूसंपादन अधिनियम, १८९४ चे कलम १८ अन्वये, भूधारकांनी मा.दिवाणी न्यायालयात अपील दाखल केले. मा.दिवाणी न्यायालयाच्या आदेशाविरुध्द अपील न करण्याबाबत विधी व न्याय विभागाने अभिप्राय दिले आहेत. त्यास अनुसरुन, मा.दिवाणी न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार संपादित जमिनीचा वाढीव मोबदला अदा करण्यासाठी विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी रुपये ७,६१,०३९/- निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे. त्यानुसार निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी मागणी केल्याप्रमाणे खालील तक्त्यात नमूद भूसंपादन प्रकरणात, मा.दिवाणी न्यायालयाने दिलेल्या आदेशानुसार जमिनीचा वाढीव मोबदला अदा करण्यासाठी विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांना रुपये ७,६१,०३९/- निधी उपलब्ध करुन देण्यास, खालील अटींच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | एलएआर क्रमांक व दिनांक | भूधारकाचे नाव | रक्कम (रुपयात) |
| --- | --- | --- | --- |
| १ | २ | ३ | ४ |
| १ | क्र.५६९/२००५, दि.४/६/२०१८ | श्रीमती मालनबाई किसन काजळे व इतर रा.नाईचाकर, ता.उमरगा, जि.उस्मानाबाद | रुपये ७,६१,०३९/- |

उस्मानाबाद जिल्ह्यातील भूकंपग्रस्तांच्या पुनर्वसनासाठी संपादित करण्यात आलेल्या जमिनीचा भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम १८ अन्वये वाढीव मोबदला अदा करण्यासाठी सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतुदीतून रु. ७,६१,०३९/- (अक्षरी रुपये सात लक्ष एकसष्ट हजार एकोणचाळीस फक्त) एवढा निधी "मागणी क्रमांक सी-०९, लेखाशीर्ष ४२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण यावरील भांडवली खर्च, ०१ पुनर्वसन, २०१ इतर पुनर्वसन योजना (००)(००)(०१) इतर पुनर्वसन योजना (अनिवार्य) (४२३५०१०८) ५०-इतर खर्च (भारित) " या लेखाशीर्षाखाली सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षात उपलब्ध तरतुदीतून विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांना खालील अटींच्या अधिन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी भूधारकास अदा करण्यासाठी परिगणना केलेली रु.७,६१,०३९/- एवढी वाढीव मोबदला रक्कम अंतिम व योग्य असल्याची खातरजमा करून सदर रक्कम भूधारकास तात्काळ अदा करावी.

२) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी मा.न्यायालयाच्या निर्णयानुसार वाढीव मोबदला मंजूरीचे आदेश तात्काळ निर्गमित करावेत.

३) अदा करण्यासाठी मंजूर केलेल्या बाबी व्यतिरीक्त अन्य बाबींवर अनुदान खर्च होणार नाही याची विभागीय आयुक्त यांनी दक्षता घ्यावी.

४) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला निधीपेक्षा जास्त निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च होणार नाही याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

५) मा.न्यायालयाच्या निर्णयानुसार वाढीव मोबदला अदा करण्यास विलंब होणार नाही याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

६) सदरच्या आदेशातील नमूद मुख्य लेखाशीर्ष मागणी क्र.सी-०९, लेखाशीर्ष ४२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण यावरील भांडवली खर्च, ०१ पुनर्वसन, २०१ इतर पुनर्वसन योजना, (००)(००)(०१) इतर पुनर्वसन योजना (अनिवार्य) (४२३५ ०१०८) ५०-इतर खर्च (भारित) या लेखाशीर्षांतर्गत वितरित केलेला कोणताही निधी शिल्लक रहाणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी कोणत्याही

Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

७) मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र. सी-०९, मुख्य लेखाशीर्ष ४२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण यावरील भांडवली खर्च, ०१ पुनर्वसन, २०१ इतर पुनर्वसन योजना (००)(००)(०१) इतर पुनर्वसन योजना (अनिवार्य) (४२३५०१०८) ५०-इतर खर्च (भारित) या लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

८) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधीसंबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

९) संबंधित अधिकारी यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय,संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७१७१८१५२३८७१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(दयानंद शं. मुंजाळे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
२. उप आयुक्त (पुनर्वसन), औरंगाबाद
३. जिल्हाधिकारी, लातूर/ उस्मानाबाद
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
५. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
६. जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर/ उस्मानाबाद
७. महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी आव्यप्र-२/ब-१/पीएसी, मंत्रालय, मुंबई - ३२
८. निवडनस्ती कार्यासन र-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.